कोल्हापूर जिल्हा कारागृह (शहर) येथील ढासळलेली तटभिंत नव्याने बांधण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग

शासन निर्णय क्र. बीएलडी २०९४/२(१०४)/पीआरएस-२

मंत्रालय, मुंबई-३२, दि. १६ मार्च, २००४

पहा :- १) कारागृह महानिरिक्षक , महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलडी-२८९४/३३६३/२१/कक्ष-३, दि. १.१.२००४.

२) शासन निर्णय क्र. बीएलडी-२०९४/२(१०४)/पीआरएस-२, दि. २३.३.१९९९.

<u>शासन निर्णय</u> :- कोल्हापूर जिल्हा कारागृह (शहर) येथील ढासळलेली तटभिंत नव्याने बांधण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयाद्वारे प्रत्यक्ष अनुदान उपलब्ध झाल्यावरच कामास सुरुवत करावी या अटीच्या अधिन प्रशासकीय मान्यता दिलेली होती. तथापि या कामास त्यावेळी योजनांतर्गत निधी उपलब्ध न झाल्याने सदर बांधकाम हाती घेण्यात आलेले नाही. सदर भिंत ही अतिशय जुनी असून तिचे दगड-मातीमध्ये बांधकाम केलेले आहे. ही भिंत जागोजागी पडलेली असून ती केव्हाही कोसळून मनुष्यहानी होण्याची शक्यता आहे. त्यासाठी कारागृहाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने संरक्षण करणे गरजेचे आहे. यास्तव सदर बांधकाम करण्यासाठी उप विभागीय अभियंता (वर्ग-१) सार्वजनिक बांधकाम उप विभाग कोल्हापूर व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर यांनी साक्षांकित केलेले रु. ६,४०,२३६/- इतक्या सुधारीत खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशे प्रशासकीय मान्यतेसाठी कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांचे उक्त संदर्भाधिन पत्र क्र. १ अन्वये शासनास सादर केले आहेत. सदर खर्चासाठी यापूर्वी सन १९९९ मध्ये दिलेल्या उक्त मंजुरीस आता जवळ जवळ पांच वर्षे होत आली असून ही मान्यता पांच वर्षानंतर व्यपगत होत असल्याने ती रद्द करुन रु. ६,४०,२३६/- इतक्या खर्चास फेर प्रशासकीय मान्यता सार्वजनिक बांधकाम विभाग व वित्त विभाग, मंत्रालय यांनी दिली आहे.

२. कोल्हापूर जिल्हा कारागृह (शहर) येथील ढासळलेली तटभिंत नव्याने बांधणे अत्यंत गरजेचे असल्याने या कामासाठी आवश्यक असलेल्या सुधारीत खर्च रुपये ६,४०,२३६/- इतक्या रकमेचा समावेश केंद्रपुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेच्या सन २००२-२००३ व २००३-२००४ च्या सुधारीत आराखड्यात केलेला असून त्यानुषगाने विभागाने "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (२०५६-०१८९)," या लेखाशिर्षाखाली सन २००३-२००४ च्या वित्तीय वर्षाच्या अर्थसंकल्पात तरतूद केलेली आहे.

३. उपरोक्त वस्तुस्थिती, कारागृहाची सुरक्षितता, कामाची निकड व त्यामुळे कारागृहाच्या सुरक्षिततेत होणारी वाढ या बाबीचा काळजीपूर्वक विचार करुन कोल्हापूर जिल्हा कारागृह (शहर) येथील ढासळलेली तटभिंत नव्याने बांधण्यासाठी सादर केलेल्या रुपये ६,४०,२३६/- (रुपये सहा लाख चाळीस हजार दोनशे छत्तीस फक्त) इतक्या खर्चास व अंदाजपत्रक आणि नकाशास शासन या शासननिर्णयाद्वारे प्रशासकीय मंजुरी देत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (२०५६-०१८९)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २००३-२००४ च्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व खर्चाची माहिती विहित विवरणपत्रात केंद्रशासनास पाठविण्यासाठी शासनास सादर करावी.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर १८४/०४/व्यय-८, दि. ०१.०३.२००४ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,

- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे
- अधिक्षक, कोल्हापूर जिल्हा कारागृह (शहर), जि. कोल्हापूर
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर.
- जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
- उप विभागीय अभियंता (वर्ग-१), सार्वजनिक बांधकाम उप विभाग, कोल्हापूर.
- कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर.
- सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२.
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.